**कृषी यांत्रिकीकरण उप-अभियान सन २०२०-२१ मध्ये राबविण्यासाठी रु.६७६२ लक्ष निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृयायों-०५२०/ प्र.क्र.५९/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुमात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२
तारीख: १४ जुलै, २०२०.

**संदर्भ:**

१. कृषी व पदुम विभाग शासन निर्णय क्र.०४१८/प्र.क्र.१५५/१४-अे, दि. २७ एप्रिल, २०१८.
२. केंद्रीय कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.३-१/२०१५-M&T(I&P), दि २७ मे, २०२०
३. केंद्रीय कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.DO ३-६ (KKA-III)/२०२०-M&T(I&P), दि ८ जून, २०२०

**प्रस्तावना:**

राज्यात केंद्र पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण उप-अभियान राबविण्यात येत आहे. या उप अभियानांतर्गत एकूण आठ घटक असून, घटक क्र. १ व २ हे नवीन तंत्रज्ञानाने विकसित केलेल्या संयंत्राची प्रात्यक्षिके, प्रशिक्षण व चाचणीबाबत आहेत. घटक क्र. १ व २ यासाठी केंद्र हिश्श्याचे प्रमाण १००% आहे. उर्वरित ६ घटकांसाठी केंद्र व राज्य शासनाच्या निधीच्या हिश्श्याचे प्रमाण ६०:४० आहे.

केंद्र शासनाने संदर्भाधीन दिनांक २७ मे, २०२० च्या पत्रान्वये, कृषि यांत्रिकीकरण उप अभियानासाठी केंद्र हिस्सा रू.३७५० लक्ष व समरुप राज्य हिस्सा रू.२५०० लक्ष अशा एकूण रू. ६२५० लक्ष निधीच्या कार्यक्रमास मान्यता दिली आहे. याशिवाय संदर्भाधीन दि. ८ जून, २०२० च्या पत्रान्वये कृषी यांत्रिकीकरण उप अभियानातील घटक क्र.६ अंतर्गत राज्यातील नंदुबार,उस्मानाबाद, वाशिम व गडचिरोली या चार आकांक्षित जिल्हयांमध्ये मध्ये यांत्रिकीकरणाचा कार्यक्रम राबविण्यासाठी रु.५१२ लक्ष निधीचा (केंद्र रु.३०७.२० लक्ष + राज्य रु.२०४.८० लक्ष) अतिरिक्त कार्यक्रम मंजूर केला आहे. अशाप्रकारे सन २०२०-२१ या वर्षासाठी एकूण रु. ६७६२ लक्ष (केंद्र रु.४०५७.२० लक्ष + राज्य रु.२७०४.८० लक्ष) निधीचा कार्यक्रम मंजूर करुन केंद्र हिश्श्याचा रू. ४०५७.२० लक्ष निधी केंद्र शासनाने वितरीत केला आहे. केंद्र हिश्श्याच्या वितरीत निधीमध्ये सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु.३१५७.२० लक्ष, अनुसूचित जाती प्रवर्गासाठी रु.६०० लक्ष व अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी रु.३०० लक्ष एवढ्या निधीचा समावेश आहे.

त्यानुसार, सदर उपअभियान सन २०२०-२१ या वर्षात राबविण्यासाठी रु.६७६२ लक्ष निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

१. सन २०२०-२१ मध्ये कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाच्या अंमलबजावणीकरिता केंद्र हिश्श्याचा रु.४०५७.२० लक्ष निधी (रुपये चाळीस कोटी सत्तावन्न लाख वीस हजार फक्त) व समरुप राज्य हिश्श्याचा रु.२७०४.८० लक्ष निधी (रुपये सत्तावीस कोटी चार लक्ष ऐंशी हजार फक्त) मिळून उप अभियानाकरिता एकूण रु.६७६२ लक्ष निधीच्या (रुपये सदुसष्ठ कोटी बासष्ठ लाख फक्त) वार्षिक कृति आराखड्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. कृषी यांत्रिकीकरण उप-अभियानामधील घटक क्र. ६ अंतर्गत राज्यातील नंदुबार, उस्मानाबाद, वाशिम व गडचिरोली या ४ आकांक्षित जिल्ह्यांमध्ये केंद्र शासनाकडून निवड केलेल्या गावांमध्ये “कृषी कल्याण अभियान -३” राबविण्यासाठी परिच्छेद क्र. १ मध्ये मंजूर केलेल्या रु.६७६२ लक्ष निधीमधून रु.५१२ लक्ष (रु.पाच कोटी बारा लाख फक्त) निधी (केंद्र हिस्सा रु.३०७.२० लक्ष + राज्य हिस्सा रु.२०४.८० लक्ष) उपलब्ध करुन देण्यात येईल. या अंतर्गत प्रती तालुका रु.१० लाख भांडवली खर्चाच्या २ कृषी अवजारे बँकांच्या स्थापनेसाठी ८०% अनुदान अनुज्ञेय राहिल. उर्वरित क्षेत्रामध्ये नियमित ४०% अनुदान अनुज्ञेय राहिल.

३. आयुक्त, कृषी यांनी योजनेची अंमलबजावणी करावी व जेंव्हा लाभार्थ्यांना निधी वर्ग करावयाचा असेल तेंव्हा आवश्यकतेनुसार निधी मागणीचा प्रस्ताव वेळोवेळी शासनास सादर करावा.

४. कृषी यांत्रिकीकरण उप-अभियानामधील घटक क्र. ३ अंतर्गत ट्रॅक्टर या बाबीसाठी जे शेतकरी ८-३० बी. एच. पी. क्षमतेपर्यंतच्या ट्रॅक्टर खरेदी करिता अर्ज करतील त्यांना प्राधान्याने अनुदान अनुज्ञेय राहिल, आणि तद्नंतर निधी शिल्लक राहिल्यास, ३० बी.एच.पी पेक्षा जास्त क्षमतेच्या ट्रॅक्टरसाठी अनुदान देण्यात यावे तथापि, घटक क्र. ४-अवजारे बँक अंतर्गत ३० बी. एच. पी. पेक्षा जास्त क्षमतेच्या ट्रॅक्टरसाठी अनुदान अनुज्ञेय राहिल.

५. केंद्र शासनाने सन २०२०-२१ मध्ये कृषी यांत्रिकीकरण उप-अभियानाकरिता निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व संदर्भाधीन दि. २७ एप्रिल, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांनूसार योजनेची अंमलबजावणी करावी तथापि, अनुसूचित जाती व जमाती, महिला, अल्प व अत्यल्प भू-धारक शेतकऱ्यांना ट्रॅक्टरच्या किंमतीच्या ५०% किंवा रु.१.२५ लाख आणि इतर शेतकऱ्यांसाठी ४०% किंवा रु.१ लाख यापैंकी जि रक्कम कमी असेल त्याप्रमाणे अनुदान द्यावे.

६. इतर यंत्र/अवजारांच्या बाबतीत कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचना त्याचप्रमाणे संदर्भाधीन केंद्र शासनाच्या दि. २७ मे, २०२० व दि. ८ जून, २०२० च्या पत्रातील सूचना, अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७. कृषी यांत्रिकीकरण उप अभियानाच्या उदिष्ट पूर्तीसाठी, संचालक (निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन, उदिष्टनिहाय अंमलबजावणी विषयक सविस्तर सूचना सर्व क्षेत्रीय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात. या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगतीचा मासिक अहवाल प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत केंद्र शासनास सादर करावा. सदर अहवाल सादर करताना त्यामध्ये महिला शेतकरी, अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती शेतकरी यांच्यासाठी निर्धारित केलेले भौतिक / आर्थिक लक्षांक व साध्य याबाबतची माहिती वेगळयाने सादर होईल, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७१४१६११०९७७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2020.07.14 16:36:13 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री ( कृषि), मंत्रालय, मुंबई-३२
२. मा.राज्यमंत्री (कृषि),मंत्रालय, मुंबई-३२
३. सर्व सन्माननीय विधी मंडळ सदस्य, द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
६. संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषि आयुक्तालय,पुणे
७. सर्व संचालक/सह संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
८. विभागीय कृषि सह संचालक (सर्व)
९. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१०.महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता)
११.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१२.नियोजन विभाग (का-१४३१) मंत्रालय, मुंबई-३२
१३.वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प -१३) मंत्रालय, मुंबई-३२
१४.मा.राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगीसचिव
१५.मा.मंत्री ( कृषि ) यांचे खाजगीसचिव
१६.निवड नस्ती (कार्यासन -१४अे)